**राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय स्तरावर अतुलनीय कामगिरी केलेल्या वयोवृध्द (कुस्तीगीर) खेळाडूंना मानधन देण्यासाठी निधी वितरित करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : निविप्र ४०२०/प्र.क्र.४९/क्रीयुसे -२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
तारीख : २९ जुलै, २०२० .

**वाचा-**

१. शासन निर्णय समाजकल्याण सांस्कृतिक कार्य, क्रीडा व पर्यटन विभाग क्रमांक -सेनिवे-१०९१/प्र.क्र.८२/क्रीयुसे -१,दिनांक १० जून, १९९३.
२. शालेय शिक्षण व क्रीडा विभाग,शासन निर्णय क्रमांक क्रीडायो २०१२/प्र.क्र.६४/१२/ क्रीयुसे-२, दि. २१ डिसेंबर, २०१२.
३. शालेय शिक्षण व क्रीडा विभाग,शासन निर्णय क्रमांक निविप्र ४०१९/प्र. क्र. ४३/क्रीयुसे-२ दि. ३१ ऑक्टोबर, २०१९
४. आयुक्त, क्रीडा व युवक सेवा,पुणे यांचे पत्र क्र. वयोखेमानधन/नि. वि. प्रस्ताव/२०२०-२१ /का-६/४५५०, दि. १९ मे, २०२०

**प्रस्तावना -**

राज्य/राष्ट्रीय/आंतरराराष्ट्रीय स्तरावर अतुलनीय कामगिरी केलेल्या वयोवृध्द (कुस्तीगीर) खेळाडूंना मानधन देण्याची योजना संदर्भ क्र. १ येथील दि.१० जून, १९९३ च्या शासन निर्णयान्वये कार्यान्वित करण्यात आली आहे. राष्ट्रीय /आंतरराराष्ट्रीय स्तरावर अतुलनीय कामगिरी केलेल्या वयोवृध्द खेळाडूंना तसेच किताब प्राप्त कुस्तीगीरांना देण्यात येणाऱ्या मानधनाचे दर संदर्भ क्र. २ येथील दि. २१ डिसेंबर, २०१२ च्या शासन निर्णयान्वये सुधारित केले आहेत.

२. सन २०१९-२० या वर्षात एकूण पात्र १२० लाभार्थी वयोवृध्द खेळाडूंना एप्रिल,२०१९ ते सप्टेंबर, २०१९ या कालावधीचे मानधन अदा करण्यासाठी रु.२९,७०,०००/- लक्ष इतका निधी संदर्भ क्र. ३ च्या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आला आहे.

सन २०१९-२० या वर्षात १२० लाभार्थी वयोवृध्द खेळाडूंना ऑक्टोबर, २०१९ ते मार्च, २०२० या कालावधीचे मानधन अदा करण्यासाठी निधी मंजूर करण्याचा प्रस्ताव संदर्भ क्र. ४ अन्वये शासनास सादर झाला आहे.

३. सदर योजनेसाठी सन २०२०-२१ या आर्थिक वर्षात रु.५६.८५ लक्ष इतका निधी अर्थसंकल्पित करण्यात आला आहे. राज्य / राष्ट्रीय / आंतरराराष्ट्रीय स्तरावर अतुलनीय

कामगिरी केलेल्या वयोवृध्द (कुस्तीगीर) १२० खेळाडूंना मानधन देण्यासाठी निधी मंजूर करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय :-</u>**

सन २०१९-२० या आर्थिक वर्षात पात्र एकूण १२० लाभार्थी वयोवृध्द खेळाडूंना ऑक्टोंबर, २०१९ ते मार्च, २०२० या कालावधीचे मानधन अदा करण्यासाठी, अर्थसंकल्पित निधीच्या ४५ % इतका निधी मंजूर करण्यास वित्त विभागाने मान्यता दिली आहे. त्यानुसार याकरिता रु.२५,५८,२५०/- लक्ष (रुपये पंचवीस लक्ष आठ्ठावन्न हजार दोनशे पन्नास फक्त) इतका निधी मंजूर करण्यास व सदर रक्कम आयुक्त, क्रीडा व युवक सेवा यांच्या अधिनस्त ठेवण्यास याद्वारे प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

४. या संदर्भात होणारा खर्च "मागणी क्र.ई-३, २२०४-क्रीडा व युवक सेवा-१०४ क्रीडा व खेळ (०८)(०२) राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय स्तरावर उल्लेखनीय कामगिरी केलेल्या नामवंत खेळाडूना मानधन (२२०४ १६५८), ३१ सहायक अनुदाने वेतनेतर" या लेखाशिर्षाखाली सन २०२०-२१ मधील मंजूर तरतूदीमधून भागविण्यात यावा. सदर अनुदान ज्या प्रयोजनासाठी मंजूर करण्यात आले आहे, त्याच प्रयोजनासाठी खर्च करण्यात यावे.

I. उपरोक्त निधी आवश्यकतेनुसार मान्य निकषानुसार खर्च करण्यात यावा. ज्यावेळेस निधी प्रत्यक्ष खर्च करावयाचा त्याच वेळी आंहरीत करावा. शासन लेख्याबाहेर बँक खात्यात हा निधी ठेवू नये.

II. राज्य शासनामार्फत वेळोवेळी वित्त विषयक निर्गमित करण्यात आलेले विविध आदेश/नियम/ शासन निर्णय वित्तीय नियमावली यांची अंमलबजावणी करुन वरील वितरीत तरतूदीचा विनियोग करण्याच्या अधीन राहून उपरोक्त तरतूद वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

५. सदर योजनेअंतर्गत वयोवृध्द खेळाडूंना मानधन मंजूर करतांना संदर्भाधीन शासन निर्णयामधील अटी व शर्ती लागू राहतील.

६. शासनाच्या सूचनांनुसार उपरोक्त तरतुद खर्च करण्याबाबतची कार्यवाही करण्यात यावी. यासाठी संबंधीत उपसंचालक/जिल्हा क्रीडा अधिकारी/लेखाधिकारी, क्रीडा व युवक सेवा, पुणे

यांना आंहरण व संवितरण अधिकारी व आयुक्त, क्रीडा व युवक सेवा यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. अनौसं ९८६/व्यय-५, दि. ७ जुलै, २०२० अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००७२९१६४९२०५४२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Swati Madhukar Nanal

Digitally signed by Swati Madhukar Nanal
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education and Sports Department, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=82e1d6f07c5cabf5884958ee70015d36b35b2c07e9700fe62cba2439a81b4be4, cn=Swati Madhukar Nanal
Date: 2020.07.29 16:22:46 +05'30'

**( स्वा. म. नानल )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.राज्यपाल,महाराष्ट्र राज्य.
२. मा.मंत्री, क्रीडा व युवक कल्याण विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
३. मा.विरोधी पक्षनेता (विधानसभा / विधानपरिषद) यांचे स्वीय सहायक, मुंबई.
४. मा. राज्यमंत्री, क्रीडा व युवक कल्याण विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
४. सर्व विधानसभा / विधानपरिषद सदस्य यांचे स्वीय सहायक.
५. अपर मुख्य सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
६. आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे,
७. महालेखापाल (लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१ - मुंबई/महाराष्ट्र-२ नागपूर,
८. महालेखापाल (लेखा), महाराष्ट्र-१ - मुंबई/महाराष्ट्र-२ नागपूर
९. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई. (क्रीडा संचालनालयामार्फत)
१०. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी (क्रीडा संचालनालयामार्फत)
११. वरिष्ठ कोषागार अधिकारी, पुणे. (क्रीडा संचालनालयामार्फत)
१२. लेखाधिकारी, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे, (क्रीडा संचालनालयामार्फत)
१३. सर्व उपसंचालक व जिल्हा क्रीडा अधिकारी (क्रीडा संचालनालयामार्फत),
१४. वित्त विभाग (व्यय-५)/अर्थ-८/नियोजन विभाग (का.१४७१), मंत्रालय, मुंबई,
१५. कार्यासन अर्थसंकल्प, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई,
१६. निवड नस्ती (क्रीयुसे-२).